**शासनमान्य ग्रामपंचायत ग्रंथालयांना सहाय्यक अनुदान (अनिवार्य) वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०१९/प्र.क्र.९२/२०१९/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २७ फ़ेब्रुवारी, २०२०.

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि.०१.०४.२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि.०८.०७.२०१९.
३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मराग्रं-२०१९/प्र.क्र.९२/२०१९/ साशि-५, दि.१३.०८.२०१९.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि.२२.०१.२०२०.
५) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३२/२०१९-२०/१७७६९, दि. ०५.०२.२०२०.

**प्रस्तावना :**

राज्यातील शासनमान्य ग्रामपंचायत ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र. डब्ल्यू-४, २२०५- कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०४) स्थानिक क्षेत्राखालील योजना, (०४) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने ( ग्रामपंचायत ग्रंथालयांना सहाय्यक अनुदाने) (२२०५ ११९६) (अनिवार्य) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षांतर्गत रु.२,०९,८८,०००/- ( अक्षरी रुपये दोन कोटी नऊ लाख अठ्ठ्यांऐशी हजार फ़क्त ) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीच्या ६० टक्केच्या मर्यादेत रु. १,२५,९२,०००/- ( अक्षरी रुपये एक कोटी पंचवीस लाख ब्यान्नव हजार फ़क्त ) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२२.०१.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये अनिवार्य खर्चाच्या बाबींची निधी वितरणाची मर्यादा ८० टक्के विहित करण्यात आली आहे. यानुषंगाने ग्रंथालय संचालकांकडून प्राप्त संदर्भाधिन दि.०५.०२.२०२० रोजीच्या प्रस्तावास अनुसरुन राज्यातील शासनमान्य ग्रामपंचायत ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीच्या ८० टक्केच्या मर्यादेत उर्वरीत २० टक्के निधी म्हणजेच रु. ४१,९७,०००/- ( अक्षरी रुपये एकेचाळीस लाख सत्त्यान्नव हजार फ़क्त ) इतका निधी वितरीत करुन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील शासनमान्य ग्रामपंचायत ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र. डब्ल्यू-४, २२०५- कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०४) स्थानिक क्षेत्राखालील योजना, (०४) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने ( ग्रामपंचायत ग्रंथालयांना सहाय्यक अनुदाने ) (२२०५ ११९६) (अनिवार्य) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) यातंर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधिच्या ८० टक्केच्या मर्यादेत उर्वरीत २० टक्के निधी म्हणजेच रु. ४१,९७,०००/- ( अक्षरी रुपये एकेचाळीस लाख सत्त्यान्नव हजार फ़क्त ) इतका निधी संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयास वितरीत व खर्च करण्यास ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच जिल्हा ग्रंथालय

अधिकारी कार्यालयाच्या कार्यालय प्रमुखांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखालील देयकावर नियंत्रक अधिकारी म्हणून प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

२. सदरचा खर्च मागणी क्र. डब्ल्यू-४, २२०५- कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०४) स्थानिक क्षेत्राखालील योजना, (०४) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (ग्रामपंचायत ग्रंथालयांना सहाय्यक अनुदाने) (२२०५ ११९६) (अनिवार्य) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षातर्गत सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी वितरीत केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. ग्रामपंचायत ग्रंथालयांना ECS/DBT/NEFT द्वारे ग्रामपंचायत खात्यामध्ये अनुदान जमा करण्यात यावे. अनुदानाच्या रक्कमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधित कार्यालय प्रमुखांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

४. वित्त विभागाच्या दि.०८.०७.२०१९ रोजीच्या परिपत्रकातील अटी व शर्तीची पुर्तता केलेली आहे. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३८/२०/व्यय-५, दि.१२.०२.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय शासनाचे www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००२२७१४४७२६४५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraya Rambhau Kahar

Digitally signed by Dattatraya Rambhau Kahar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc29789a0057acb8ed170e1748553c17db300239c347be5264afbff5eb51fcac, cn=Dattatraya Rambhau Kahar
Date: 2020.02.27 14:50:31 +05'30'

**( द. रा. कहार )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल -२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. सर्व जिल्हा ग्रंथालय अधिकारी
८. सचिव (उ.व.तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक
९. कक्ष अधिकारी (साशि १), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (साशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.